सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ या
पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक : डीपीपी-२०१५/प्र.क्र.९३/पोल-१०,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३० जुलै,२०१५

**संदर्भ :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्रमांक ९८६ (१०) /९३१९/आठ, दिनांक ०४.०४.२०१५ चे पत्र**

**शासन आदेश :-**

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : एसपीपी-२२९५/ प्र.क्र.१४९/ पोल-१०, दिनांक २० मे, १९९७ अन्वये संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त विविध आस्थापनेवर सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ ची पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर पदे ही सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरावयाची आहेत. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने वरील संदर्भाधीन पत्रान्वये सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावर शिफारस केलेल्या उमेदवाराची परिविक्षाधीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावर त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या ठिकाणी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| क्र. | नांव | प्रवर्ग | आयोगाने नियुक्तीसाठी शिफारस केलेला प्रवर्ग | विभागाने मान्य केलेला विभागीय संवर्ग | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| | श्री. अमर दीप अशोक चवरे | अ.जा. | अ.जा. | नागपूर | नागपूर जिल्हा |

२. वरील उमेदवाराची नियुक्ती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(१) संबंधीत उमेदवारास नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे लागेल. अन्यथा त्यांना सेवाज्येष्ठता गमवावी लागेल.

(२) परिविक्षा कालावधी ते नियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या दिनांकापासून २ वर्षाचा (प्रशिक्षण कालावधी धरुन) असेल.

(३) या पदासाठी विहित केलेले प्रशिक्षण त्यांना पूर्ण करावे लागेल.

(४) सदर परिविक्षाधीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रशिक्षंण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९ मार्च,२००३ अन्वये संगणक हाताळणी वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त आवश्यक ते प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत विभाग प्रमुखाकडे सादर करणे अनिवार्य राहिल. अन्यथा प्रस्तुत पदावरील त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

**(५)** सदर उमेदवाराला या आदेशान्वये नियुक्ती दिली असली तरी, त्याची सेवाज्येष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ठरविलेल्या गुणवत्ता क्रमांकानुसार राहिल. अद्याप आयोगाने ४ पदांचा निकाल जाहीर केलेला नाही. प्रस्तुत निकाल जाहीर झाल्यानंतर उमेदवाराचा गुणवत्ता क्रमांक एकत्रितरित्या आयोगाकडून कळविण्यात येणार आहे.

**(६)** नियुक्तीवर रुजू होण्यासाठी कराव्या लागणा-या प्रवासासाठी उमेदवाराला प्रवास भत्ता मिळणार नाही.

**(७)** उमेदवाराने दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी किंवा त्यानंतर शासनाने विहित नियमानुसार वाढविलेला परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांची सहाय्यक सरकारी अभियोक्ता या संवर्गात नियमित नियुक्ती केली जाईल.

(८) उमेदवाराला परिविक्षा कालावधीमध्ये रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे-५४००/- या वेतनश्रेणीत वेतन मिळेल. प्रस्तुत वेतनश्रेणी उच्च न्यायालयातील रिट याचिका क्रमांक ८४७४/२०१० मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहिल. परिविक्षा कालावधीमध्ये पहिली वार्षिक वेतनवाढ देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१३७०/डी, दिनांक १२.०४.१९७२ नुसार देण्यात येईल. त्यांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय रहातील.

**(९)** शासनाने दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ८४७४/२०१० वरील उच्च न्यायालयाचा निर्णय राज्य शासनाच्या बाजूने झाल्यास, संबंधीत उमेदवारांकडून अतिप्रदान झालेली रक्कम वसूल करण्यात येईल. त्यासाठी " शासनाच्या बाजूने उपरोक्त अपीलाचा निर्णय झाल्यास, थकबाकीची रक्कम शासनास परत करण्यात येईल" अशा आशयाची क्षतिपूर्ती बंधपत्रे ( Indemnity Bond) संबंधीत उमेदवारांना भरुन द्यावी लागतील.

**(१०)** उमेदवार जर दोन वर्षाच्या कालावधीच्या आत किंवा वाढविलेल्या परिविक्षा कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करु शकले नाहीत आणि / किंवा विहित परिक्षा / चाचण्या उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैरवर्तणुकीबद्दल दोषी आढळले किंवा शासकीय सेवेत अभियोग्य नसतील तर त्यांची सेवा समाप्त करण्यात येईल.

**(११)** नियमाप्रमाणे उमेदवाराला विहित मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण व्हावे लागेल.

**(१२)** उमेदवाराची पदस्थापना सदर शासन निर्णयात दर्शविण्यात आलेल्या जिल्ह्यातच करण्यात येईल व जिल्ह्याबाहेर, व्यवस्था म्हणून संबंधित सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता यांच्याकडून इतरत्र करण्यात येणार नाही, याबाबतची दक्षता संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घ्यावी.

**(१३)** उमेदवारांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्रं.अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१.१०.२००५ नुसार विहित केलेली परिभाषित अंशदायी निवृत्ती योजना लागू राहील.

**(१४)** वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्त्याखालील राज्य सेवा अधिका-यांना लागू असलेले अन्य सर्व सेवाविषयक नियम उमेदवारांना लागू होतील.

**(१५)** मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील रिट याचिका क्रमांक ५९२६/२०१४ प्रकरणी मा. न्यायालयाच्या दिनांक ११.०३.२०१५ च्या आदेशानुसार सदर नियुक्ती देण्यात आली आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७३११०२५०६५४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: CN = Arun Vishnupant Joshi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.07.31 13:29:45 +05'30'

**(अ.वि.जोशी)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२ व १६-ब), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मा.मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता,नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८) श्री.अमरदीप अशोक चवरे, मु.पो. शहापूर (आनंदनगर), पोलीस ठाणे-जवाहरनगर तालुका आणि जिल्हा- भंडारा ४४१ ९०६
९) निवड नस्ती (गृह विभाग, पोल-१०)